तात्काळ

क्रमांक आरजीए-१०८७/२८३६/१८-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० ऑक्टोबर १९८७.

प्रति

सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख.

विषय :- महाराष्ट्र राज्य कर्मचारी महासंघाच्या रौप्य महोत्सवी अधिवेशनास उपस्थित राहणाऱ्या संघटनांच्या प्रतिनिधींना/पदाधिकाऱ्यांना विशेष रजा देण्याबाबत.

महोदय,

महाराष्ट्र राज्य सरकारी कर्मचारी महासंघाचे रौप्य महोत्सवी अधिवेशन, दिनांक ३१ ऑक्टोबर आणि १, २ व ३ नोव्हेंबर १९८७ रोजी मुंबई येथे आयोजित करण्यात आले आहे. या अधिवेशनास उपस्थित राहणाऱ्या प्रतिनिधींना ३ दिवस विशेष रजा मंजूर करण्यासंबंधीची विनंती महासंघाने शासनाकडे केली आहे.

२. सदरहू विनंतीचा विचार करून शासन असा आदेश देत आहे की, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरजीए-१०८४/२७६/सीआर-२०/१६-अ, दिनांक २५-१०-८५

क्र. दिनांक १८-१२-८५ मध्ये विहित केल्याप्रमाणे संघटनांच्या पदाधिकाऱ्यांना व कार्यकारिणीच्या सभासदांना अनुक्रमे १० दिवस किंवा ७ दिवस कमाल मर्यादेच्या अधीन राहून या रौप्य महोत्सवी अधिवेशनासाठी विशेष नैमित्तिक रजा मंजूर करण्यास हरकत नसावी. ही सवलत फक्त शासन मान्यता प्राप्त संघटनांच्या मुख्य शाखेच्या पदाधिकाऱ्यांनाच आणि कार्यकारिणीचे सदस्यांना देण्यात यावी. अन्य प्रतिनिधींना शासकीय कामकाजाची निकड लक्षात घेऊन त्यांच्या खाती असलेल्या नैमित्तिक रजा किंवा इतर देय रजा मंजूर करण्यास हरकत नसावी.

आपला,

प्र. द. माळवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी --
सर्व कार्यालय प्रमुख.